अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिपत्याखालील पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई व संचालनालय नागरी पुरवठा (गो/वा) मुंबई कार्यालयांतील कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांचे समायोजन करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : - आस्थाप्र-१८२२/प्र.क्र.७२/ना.पु.१२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २३ मे, २०२३.

**संदर्भ :-**

१. अ.ना.पु. व ग्रा.सं विभागाचा आकृतीबंध शासन निर्णय दि.२६.६.२००३
२. अ.ना.पु. व ग्रा.सं.विभागाचा सुधारित आकृतीबंध शासन निर्णय दि.१८.४.२०२२.
३. वित्त विभाग शासन निर्णय दि.१०.९.२००१.
४. वित्त विभाग शासन निर्णय दि.२६.३.२००४.
५. वित्त विभाग शासन निर्णय दि.२.६.२०१५
६. सामान्य प्रशासन विभागाची दि.२१.६.२०२१ ची अधिसूचना.

**प्रस्तावना :-**

विभागाच्या अधिनस्त कार्यालयांचा उच्चस्तरीय सचिव समितीने दि.२६.११.२०२१ रोजीच्या बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेनुसार सुधारित आकृतीबंधाचा शासन निर्णय दि.१८.४.२०२२ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. संचालक, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई कार्यालयातील ८ अधिकारी/कर्मचारी व संचालनालय नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई कार्यालयातील २९ अधिकारी/ कर्मचारी अशा एकुण ३७ अधिकारी/कर्मचारी यांचे विभागाच्या अधिनस्त कार्यालयांमध्ये समायोजन करण्याचे प्रस्तावित आहे.

२. संचालक, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई कार्यालयातील ८ अधिकारी/कर्मचारी व संचालनालय नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई कार्यालयातील २९ अधिकारी/कर्मचारी अशा एकुण ३७ अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई, वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, मुंबई, राज्य अन्न आयोग, मुंबई, विभागीय/जिल्हा पुरवठा कार्यालय, नियंत्रक वैधमापनशास्त्र मुंबई व राज्य तक्रार निवारण आयोग, मुंबई या विभागाच्या अधिनस्त कार्यालयांमधील सरळसेवा किंवा पदोन्नती कोट्यातील रिक्त पदांवर समायोजन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. वित्त विभाग शासन निर्णय दि.२.६.२०१५ नुसार प्रशासकीय विभागाला प्रशासनावर कोणताही विपरित परिणाम न होता, विभागामध्ये उपलब्ध अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे समायोजन करण्याचे संपूर्ण अधिकार राहतील. विभागाच्या ज्या संवर्गाच्या बाबतीत कामांची आवश्यकता कमी झाली आहे, अशा संवर्गातील पदांची विभागातील तीच वेतनश्रेणी असलेल्या दुसऱ्या संवर्गात

आवश्यकतेनुसार पदे स्थानांतरण करता येतील. तथापि विभागांतर्गत एकूण पद संख्येच्या मर्यादेतच असे समायोजन राहील.

२. वित्त विभागाच्या दि.२.६.२०१५ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुद व खालील सेवाविषयक बाबी विचारात घेऊन, विभागाच्या अधिनस्त पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई या कार्यालयातील ८ अधिकारी/कर्मचारी व संचालनालय नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई या कार्यालयातील २९ अधिकारी/कर्मचारी अशा एकुण ३७ कार्यरत अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे समायोजन विभागाच्या अधिनस्त कार्यालयांमध्ये सोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ"मध्ये दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे :-

i. **सेवाज्येष्ठता** :- सामान्य प्रशासन विभाग दि.२१.६.२०२१ च्या म.ना.से.(ज्येष्ठतेचे विनियम) नियमावली, २०२१ मधील नियम क्र.३ (१) मध्ये नमूद केलेल्या शेवटच्या परंतुका नियमानुसार ज्येष्ठतेचा दिनांक निश्चित करण्यात यावा. उपरोक्त दोन कार्यालयातील कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांना ज्या संवर्गात समायोजन करण्यात येईल, अशा संवर्गात नियुक्ती झालेल्या दिनांकापासून त्यांची ज्येष्ठता विचारात घेण्यात यावी.

ii. **बिंदुनामावली** :- अधिकारी/ कर्मचारी यांची नियुक्ती त्यांच्या मूळ प्रवर्गाच्या बिंदुवर करण्यात यावी. जर संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्याचा मूळ प्रवर्गाचा बिंदु रिक्त नसेल तर सदर अधिकारी/कर्मचाऱ्यांची नियुक्ती खुल्या प्रवर्गाच्या बिंदुवर दर्शविण्यात यावी. तसेच अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे समायोजन ज्या कोटयात (सरळसेवा/पदोन्नती) पद रिक्त आहे, त्या पदावर समायोजन करण्यात यावे.

iii. **वेतनश्रेणी** :- वित्त विभाग शासन निर्णय दि.२६.३.२००४ नुसार वरिष्ठ संवर्गातून निम्न संवर्गात समायोजनाने नियुक्ती देण्यात आलेले अधिकारी/कर्मचारी यांची पूर्वीच्या पदावरील वेतनश्रेणी संरक्षित करण्यात यावी. समकक्ष पदावर समायोजनाने नियुक्ती देण्यात आलेले अधिकारी/कर्मचारी आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत उच्च वेतनश्रेणी धारण करीत असल्यास सदर वेतनश्रेणी संरक्षित करण्यात यावी. तसेच सदर कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांची समायोजनापूर्वीची सेवा आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत लाभ देण्यासाठी ग्राहय धरण्यात यावी.

iv. संचालनालय नागरी पुरवठा (गो/वा) या कार्यालयातील अलिकडील काळात जे अधिकारी/कर्मचारी सेवानिवृत्त झाले आहेत, त्यांच्या सेवानिवृत्तीविषयक लाभ मंजूर करण्याबाबतची कार्यवाही नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई कार्यालयामार्फत करण्यात यावी. तसेच यापूर्वी सेवानिवृत्त झालेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्याबाबत अधिदान व लेखाधिकारी/ महालेखापाल या कार्यालयांकडून पत्रव्यवहार झाल्यास तो देखील नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई कार्यालयामार्फत करावा. तसेच संचालनालय नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई कार्यालयाचे सर्व अभिलेख नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई कार्यालयाकडे जतन करावे.

३. पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई व संचालनालय नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई या कार्यालयातील एकूण ३७ अधिकारी/कर्मचारी यांनी दिलेल्या इच्छुकतेनुसार व विभागाच्या अधिनस्त कार्यालयातील रिक्त पदे विचारात घेऊन परिशिष्ट-अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे समायोजन करण्यात येत आहे.

४. संचालनालय नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई या कार्यालयाकडे असलेले कामकाज नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई कार्यालयाने पहावे.

५. संचालनालय नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई कार्यालयातील कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांची समायोजनाची प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर संचालनालय नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई हे कार्यालय बंद करण्यात येईल.

६. उपसंचालक, पुरवठा आयुक्त कार्यालय मुंबई व उपसंचालक, संचालनालय नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई यांनी सदर अधिकारी /कर्मचाऱ्यांना कार्यालयातून १५ दिवसांत कार्यमुक्त करण्याचे आदेश निर्गमित करण्यात यावेत.

७. उच्चस्तर सचिव समितीने दि.२६.११.२०२१ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार व वित्त विभागाच्या दि.२.६.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार प्रस्तुत शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५२४११५७१४०५०६ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NETRA PRASHANT MANKAME

Digitally signed by NETRA PRASHANT MANKAME
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=19e4a6ac471ded0614da7ea31c20099ea471d8436dcf49faa3c0b2e0638732c3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C3DA775EEDF3E67170F45DF66F5DEAC516C0B0AB689DA4176D3BEBB60CCAD385, cn=NETRA PRASHANT MANKAME
Date: 2023.05.24 12:01:17 +05'30'

**( नेत्रा मानकामे )**
**शासनाच्या उप सचिव**

**प्रति,**

१) मा.मंत्री (अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
२) मा.राज्यमंत्री (अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
३) विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद.
४) महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
५) महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे उपसचिव.
७) अ.मु.स./प्र.स./सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
८) सर्व विभागीय आयुक्त.
९) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
१०) नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई.
११) संचालक, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई.
१२) सर्व सहसचिव/उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई

१३) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) सर्व जिल्हाधिकारी
१५) सर्व उप आयुक्त (पुरवठा)
१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई.
१८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१९) प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
२०) ग्राहक कल्याण सल्लागार समिती, मुंबई.
२१) सचिव, राज्य अन्न आयोग, मुंबई.
२२) उपसंचालक, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई.
२३) उपसंचालक, संचालनालय नागरी पुरवठा, (गोदाम/वाहतूक), मुंबई.
२४) वित्त विभाग ( व्यय-१०, आपुक कक्ष,वित्तीय सुधारणा,सेवा-९,अर्थसंकल्प- ११ ), मंत्रालय, मुंबई.
२५) कार्यासन-ना.पु.१५, ग्रा.सं.२, ग्रा.सं.३, ग्रा.सं.४., अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
२६) निवडनस्ती, ना.पु.१२.

# परिशिष्ट - अ

| पदनाम/संवर्ग:- उपसंचालक वेतनश्रेणी :- S-२०-५६१००-१७७५०० | | | | |
|---|---|---|---|---|
| अ.क्र. | कर्मचा-याचे नाव | सध्याचे कार्यरत पदनाम व कार्यालय | जात/प्रवर्ग | समायोजनानंतरची पदस्थापना |
| १ | श्री.अनिल टाकसाळे | उपसंचालक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | इ.मा.व | उपनियंत्रक शिधावाटप (आस्थापना), नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई |
| पदनाम/संवर्ग:- लघुलेखक (उच्चश्रेणी) वेतनश्रेणी :- S-१६-४४९००-१४२४०० | | | | |
| अ.क्र. | कर्मचा-याचे नाव | सध्याचे कार्यरत पदनाम | जात/प्रवर्ग | समायोजनानंतरची पदस्थापना |
| २ | श्री. दी. तु. धुरी | लघुलेखक (उच्चश्रेणी), संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | खुला | लघुलेखक (उच्चश्रेणी) , नियंत्रक वैध मापन शास्त्र मुंबई |
| ३ | श्री. ब. प्र. मसाले | लघुलेखक (उच्चश्रेणी), पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई | खुला | लघुलेखक (उच्चश्रेणी), राज्य अन्न आयोग, मुंबई |
| | | | | |
| पदनाम/संवर्ग:- लघुलेखक (निम्नश्रेणी) वेतनश्रेणी :- S-१५: ४१८००-१३२३०० | | | | |
| अ.क्र. | कर्मचा-याचे नाव | सध्याचे कार्यरत पदनाम व कार्यालय | जात/प्रवर्ग | समायोजनानंतरची पदस्थापना |
| ४ | सौ.चै.चं.भोसले | लघुलेखक (निम्नश्रेणी),संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | खुला | लघुलेखक (निम्नश्रेणी), वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय |
| ५ | श्री. मा.शि.मडावी | लघुलेखक (निम्नश्रेणी), संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | अ. जमाती | लघुलेखक (निम्नश्रेणी), वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय |
| | | | | |
| पदनाम/संवर्ग:- अधिक्षक/निरिक्षक अधिकारी वेतनश्रेणी :- S-१४-३८६००-१२२८०० | | | | |
| अ.क्र. | कर्मचा-याचे नाव | सध्याचे कार्यरत पदनाम व कार्यालय | जात/प्रवर्ग | समायोजनानंतरची पदस्थापना |
| ६ | श्री. रो. रा. माळकर | अधिक्षक, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई | खुला | शिधावाटप अधिकारी, नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई |
| ७ | श्री. नि. ज. रेडकर | अधिक्षक/ निरिक्षक अधिकारी, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | खुला | शिधावाटप अधिकारी, नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई |
| ८ | श्रीम.वृ.वि. मोरे | निरिक्षक अधिकारी, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई | खुला | निरिक्षण अधिकारी ,जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालय, ठाणे |
| ९ | श्रीम. स्वा.रे. वाडेकर | निरिक्षक अधिकारी, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई | खुला | निरिक्षण अधिकारी ,उप आयुक्त (पुरवठा),कोकण विभाग |
| १० | श्री. अ. भा. पाटील | निरिक्षक अधिकारी,पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई | खुला | निरिक्षण अधिकारी ,उप आयुक्त (पुरवठा), नाशिक विभाग |
| | | | | |
| पदनाम/संवर्ग:- मुख्य लिपिक/उपमुख्य निरिक्षक अधिकारी वेतनश्रेणी :- S-१३: ३५४००-११२४०० | | | | |
| अ.क्र. | कर्मचा-याचे नाव | सध्याचे कार्यरत पदनाम व कार्यालय | जात/प्रवर्ग | समायोजनानंतरची पदस्थापना |
| ११ | श्री. रा. सो. मसराम | मुख्य लिपिक/उपमुख्य निरिक्षक अधिकारी, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | अ. जमाती | पुरवठा निरिक्षक, जिल्हा पुरवठा अधिकारी, ठाणे |
| १२ | श्री.सं. आ.जंगम | मुख्य लिपिक/उपमुख्य निरिक्षक अधिकारी, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा),मुंबई | इमाव | सहायक शिधावाटप अधिकारी, नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई |
| १३ | श्री. सु. रा. मेश्राम | मुख्य लिपिक/उपमुख्य निरिक्षक अधिकारी, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा),मुंबई | अ. जाती | सहायक शिधावाटप अधिकारी, नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई |
| १४ | श्री. सो.बं. रसाळ | मुख्य लिपिक/उपमुख्य निरिक्षक अधिकारी, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा),मुंबई | विमाप्र | पुरवठा निरिक्षक, जिल्हा पुरवठा अधिकारी, सातारा |
| १५ | श्रीम. नि.प्र. खाडे | मुख्य लिपिक/उपमुख्य निरिक्षक अधिकारी ,संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा),मुंबई | वि.जा. (अ) | सहायक शिधावाटप अधिकारी, नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई |
| | | | | |
| पदनाम/संवर्ग:- वरिष्ठ लिपिक/पुरवठा निरिक्षक वेतनश्रेणी :- S-८: २५५००-८११०० | | | | |
| अ.क्र. | कर्मचा-याचे नाव | सध्याचे कार्यरत पदनाम व कार्यालय | जात/प्रवर्ग | समायोजनानंतरची पदस्थापना |
| १६ | श्री. गं.बा. गाढे | वरिष्ठ लिपिक/पुरवठा निरिक्षक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | अ. जाती | लिपिक-टंकलेखक, जिल्हा पुरवठा कार्यालय, हिंगोली |
| १७ | श्री. सु. सि. मांडवकर | वरिष्ठ लिपिक/पुरवठा निरिक्षक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | इ.मा.व. | लिपिक-टंकलेखक, जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालय, ठाणे |
| १८ | श्री. श्री. श. घाग | वरिष्ठ लिपिक/पुरवठा निरिक्षक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | खुला | वरिष्ठ लिपिक, राज्य अन्न आयोग, मुंबई |
| १९ | श्री. बा. व्यं. भातलोंढे (निलंबित) | वरिष्ठ लिपिक/पुरवठा निरिक्षक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा),मुंबई | खुला | उच्चस्तर लिपिक, वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय ,मुंबई |
| २० | श्री. अ.स.कोटुळे | वरिष्ठ लिपिक/पुरवठा निरिक्षक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | खुला | उच्चस्तर लिपिक, वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, मुंबई |
| २१ | श्री. वि.द. सोनवणे | वरिष्ठ लिपिक/पुरवठा निरिक्षक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | इ.मा.व. | लिपिक-टंकलेखक, जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालय, ठाणे |
| २२ | श्री. सु.बा. रसाळ | वरिष्ठ लिपिक/पुरवठा निरिक्षकसंचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | इ.मा.व. | लिपिक-टंकलेखक,जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालय, नाशिक |
| २३ | श्री. दि. उ. तायडे | वरिष्ठ लिपिक/पुरवठा निरिक्षक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | अ. जाती | वरिष्ठ लिपिक, राज्य अन्न आयोग, मुंबई |
| २४ | श्री. नि. न. माने | पुरवठा निरिक्षक पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई | भ. ज. (ब) | लिपिक-टंकलेखक,जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालय, कोल्हापुर |
| २५ | श्रीम. प्रि. भा. घोडे | पुरवठा निरिक्षक पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई | इमाव | लिपिक-टंकलेखक, उप आयुक्त (पुरवठा), अमरावती |
| २६ | श्री. शि. स. गायकवाड | पुरवठा निरिक्षक पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई | अ.ज. | लिपिक-टंकलेखक, जिल्हा पुरवठा कार्यालय, हिंगोली |
| | | | | |
| पदनाम/संवर्ग:- लिपिक-टंकलेखक वेतनश्रेणी :- S-६: १९९००-६३२०० | | | | |
| अ.क्र. | कर्मचा-याचे नाव | सध्याचे कार्यरत पदनाम व कार्यालय | जात/प्रवर्ग | समायोजनानंतरची पदस्थापना |
| २७ | श्री. प्र.सा. सुर्यवंशी | लिपिक-टंकलेखक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | अ. जमाती | लिपिक-टंकलेखक, जिल्हा पुरवठा कार्यालय,ठाणे |
| २८ | श्रीम. ल. व. चव्हाण | लिपिक-टंकलेखक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | वि. जा. (अ) | लिपिक-टंकलेखक, नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई |
| २९ | श्री. र. गो. बांबळे | लिपिक-टंकलेखक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | अ. जमाती | लिपिक-टंकलेखक, जिल्हा पुरवठा कार्यालय, पुणे |
| ३० | श्री. स.बा. गिते | लिपिक-टंकलेखक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | भ. ज. (ड) | लिपिक-टंकलेखक,उप आयुक्त (पुरवठा),कोकण विभाग |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३१ | श्री. श.के. कुड | लिपिक-टंकलेखक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | इ.मा.व. | लिपिक-टंकलेखक, राज्य अन्न आयोग, मुंबई |
| ३२ | श्री. स.व. म्हस्के | लिपिक-टंकलेखक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | अ. जाती | लिपिक-टंकलेखक, जिल्हा पुरवठा कार्यालय,ठाणे |
| | | | | |
| **पदनाम/संवर्ग:- नाईक(गट-ड) वेतनश्रेणी :- S-३: १६६००-५२४००** | | | | |
| **अ.क्र.** | **कर्मचा-याचे नाव** | **सध्याचे कार्यरत पदनाम व कार्यालय** | **जात/प्रवर्ग** | **समायोजनानंतरची पदस्थापना** |
| ३३ | श्री. मो. आ. खान | नाईक, संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | खुला | नाईक,नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई |
| ३४ | श्री. सं. रा. साळवी | नाईक,संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | खुला | नाईक,नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई |
| | | | | |
| **पदनाम/संवर्ग:- शिपाई /सफाईगार/हमाल(गट-ड) वेतनश्रेणी :- S-१: १५०००-४७६००** | | | | |
| **अ.क्र.** | **कर्मचा-याचे नाव** | **सध्याचे कार्यरत पदनाम व कार्यालय** | **जात/प्रवर्ग** | **समायोजनानंतरची पदस्थापना** |
| ३५ | श्री. ना. वा.झुलपे | शिपाई /सफाईगार/हमाल संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | दिव्यांग अल्पदृष्टी, इमाव | शिपाई, नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई |
| ३६ | श्री. ल.सु. यादव | शिपाई /सफाईगार/हमाल संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | खुला | शिपाई,नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई |
| ३७ | श्री. स.हि. मारु | शिपाई /सफाईगार/हमाल संचालनालय, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई | खुला | शिपाई,नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई |